सन २०२१-२२ व २०२२-२३ या आर्थिक वर्षातील १५ व्या वित्त आयोगा अंतर्गत केंद्र शासनाने वितरीत केलेला निधी प्राप्त करुन घेण्यासाठी झालेल्या विलंबाबाबत दंडात्मक व्याजाची (Penal Interest) रक्कम राज्य आरोग्य सोसायटीस अदा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पंविआ-५०२४/प्र.क्र.१०२/आरोग्य -७**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : २४ मे, २०२४.

वाचा :-

१. संचालक (वित्त व लेखा) राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्र.राआअ/ वित्त/ २०२३-२४/१३५६१०/२०२४, दिनांक १४/०२/२०२४.
२. केंद्र शासनाचे पत्र क्र.F.१५ (४२) FC-XV/FCD/२०२०-२५, दिनांक १२/११/२०२१
३. केंद्र शासनाचे पत्र क्र.F.१५ (४२) FC-XV/FCD/२०२०-२५, दिनांक २४/११/२०२१
४. शासन निर्णय क्र.पंविआ-५०२१/प्र.क्र.१०८/२१/आरोग्य-७, दिनांक २०/१२/२०२१
५. केंद्र शासनाचे पत्र क्र.F.१५ (४२) FC-XV/FCD/२०२०-२५, दिनांक २१/०२/२०२३
६. केंद्र शासनाचे वित्त मंत्रालयाचे ज्ञापन क्र.F.१५ (४२) C-XV/FCD/२०२०-२५, दिनांक ११/१२/२०२३
७. केंद्र शासनाचे वित्त मंत्रालयाचे ज्ञापन क्र.FC.१५ (४२) C-XV/FCD/२०२०-२५, दिनांक १२/०४/२०२४

प्रस्तावना :-

केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालयाच्या दिनांक ११/१२/२०२३ च्या कार्यालयीन ज्ञापनान्वये केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या मंजूरी आदेशामधील निधी १० कामाच्या दिवसामध्ये वितरीत करणे बंधनकारक आहे. तसेच, अशा प्रकारे १० दिवसात निधी वितरीत न झाल्यास, झालेल्या विलंब कालावधीसाठी केंद्र शासनाने विहित केलेल्या दरानुसार दंडात्मक व्याज राज्य शासनास भरणे

अनिवार्य आहे. अशा प्रकारची कार्यवाही न केल्यास १५ व्या वित्त आयोगा अंतर्गत पुढील टप्प्यातील निधी केंद्र शासन वितरीत करणार नाही. प्रस्तुत प्रकरणी केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालयाच्या संदर्भ क्र. (६) येथील दिनांक ११/१२/२०२३ रोजीच्या प्राप्त ज्ञापनानुसार १५ वा वित्त आयोगातंर्गत केंद्र शासनाने वितरीत केलेला निधी राज्य आरोग्य सोसायटीस प्राप्त करुन घेण्यास झालेल्या विलंबासाठी दंडात्मक व्याज (Penal Interest) शासनास अदा करण्याबाबत संचालक (वित्त व लेखा) राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी शासनास संदर्भ क्र. (१) येथील दिनांक १४/०२/२०२४ च्या पत्रान्वये प्रस्ताव सादर केला होता. त्यानुसार सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात केंद्र शासनाने १५ व्या वित्त आयोगातंर्गत मंजुर करण्यात आलेल्या अनुदानापैकी पहिल्या टप्प्यात केंद्र शासनाने निर्गमित केलेले मंजुरी आदेश व त्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीस प्राप्त झालेला निधी यामधील १० दिवसापेक्षा जास्त झालेल्या विलंबाच्या अनुषंगाने रु.१५५३.६० लक्ष दंडात्मक व्याजाची रक्कम होत आहे. तसेच, सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात केंद्र शासनाने दुस-या टप्प्यात केंद्र शासनाने निर्गमित केलेले मंजुरी आदेश व त्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीस प्राप्त झालेला निधी यामधील १० दिवसापेक्षा जास्त झालेल्या विलंबाच्या अनुषंगाने रु.८.०९ लक्ष इतकी दंडात्मक व्याजाची रक्कम होत आहे. अशी एकुण रु.१५६१.६८ लक्ष इतकी रक्कम होत आहे. सदर दंडात्मक रक्कम राज्य आरोग्य सोसाटीस वितरीत न केल्यास केंद्र शासन १५ व्या वित्त आयोगाच्या सन २०२२-२३ मधील पुढील टप्प्यातील रु.७००.०० कोटी इतके अनुदान वितरीत करणार नसल्याचे संदर्भ क्र.(७) येथील पत्रान्वये दिसून येते. त्यामुळे सन २०२१-२२ व २०२२-२३ या आर्थिक वर्षातील १५ व्या वित्त आयोगा अंतर्गत प्राप्त झालेला निधी राज्य आरोग्य सोसायटीस प्राप्त करुन घेण्यासाठी १० दिवसापेक्षा जास्त झालेल्या विलंबासाठी रु.१५६१.६८ लक्ष इतकी रक्कम उपलब्ध करुन देण्याबाबत वित्त विभागास विनंती करण्यात आलेली होती. त्याअनुषंगाने वित्त विभागाने सदरची रक्कम विभागाने त्यांच्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून खर्च करण्याबाबत सक्षम प्राधिका-यांच्या मंजूरीने निर्णय घेण्याबाबत अभिप्राय दिलेले आहेत. त्याअनुषंगाने १५ व्या वित्त आयोगा अंतर्गत केंद्र शासनाने वितरीत केलेला निधी राज्य आरोग्य सोसायटीस प्राप्त करुन

घेण्यासाठी झालेल्या विलंबासाठीची दंडात्मक व्याजाची रक्कम रु.१५६१.६८ लक्ष इतकी रक्कम राज्य आरोग्य सोसायटीस वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१५ व्या वित्त आयोगा अंतर्गत केंद्र शासनाने सन २०२१-२२ व २०२२-२३ या आर्थिक वर्षामध्ये वितरीत केलेला निधी राज्य आरोग्य सोसायटीस प्राप्त करुन घेण्यासाठी झालेल्या विलंबाबाबतची दंडात्मक व्याजाची (Penal Interest) रु.१५६१.६८ लक्ष इतकी रक्कम २२१०H१८७ या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून वितरीत करुन राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

०२. सदरचा खर्च राज्य लेखाशिर्ष २२१०H१८७ अंतर्गत सन २०२४-२५ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व त्या लेखाशिर्षाखाली खर्ची दाखविण्यात यावा.

०३. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करुन विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटीच्या यांच्याकडे सूपुर्द करावी. यासाठी सहसंचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, मुंबई यांना “नियंत्रण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर प्रस्तावावरील खर्च खालील प्रमाणे नमुद लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२४-२५ साठी मंजुर करण्यात आलेल्या उपलब्ध तरतुदीतुन भागविण्यात यावा.

(रु. लाखात)

| अ.क्र. | तपशील | मुळ अर्थसंकल्पीय तरतुद (२०२४-२५) | उपलब्ध करुन दयावयाची दंडात्मक व्याजाची रक्कम (Penal Interest) |
|---|---|---|---|
| १ | मागणी क्र. आर-१<br>२२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य<br>०१ - नागरी आरोग्य सेवा- विषमचिकित्सा<br>११०- रुग्णालये व दवाखाने<br>(०८) १५ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार सहाय्यक अनुदाने<br>(०८) (०२) नागरी आरोग्यवर्धिनी केंद्र (अनिवार्य) (अनिवार्य) १०० % केंद्र हिस्सा<br>(२२१०H१८७) ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) | ८५३४८.२० | १५६१.६८ |

०५. वित्त विभागाच्या दिनांक ०१ एप्रिल, २०२४ च्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.८ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटी व शर्तींची पूर्तता केली असल्याचे कार्यक्रम प्रमुख / संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी शासनास कळविले असून त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक ०१/०४/२०२४ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्ठातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

०६. यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीच्या लेखा परिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप नसल्याचे राज्य आरोग्य सोसायटीने प्रमाणित केलेले आहे.

०७. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच, भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या

धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक ०१ एप्रिल, २०२४ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे /अटी व शर्तीचे पालन करुन त्या संदर्भात आवश्यक ते प्रमाणपत्र सादर करणे अथवा आवश्यक त्या बाबीं स्वतंत्रपणे प्रमाणित करणे राज्य आरोग्य सोसायटीस अथवा सदरहून निधी ज्या यंत्रणेमार्फत खर्च करण्यात येणार त्या कार्यक्रम प्रमुखास बंधनकारक राहील.

महाराष्ट्र शासन वित्त विभाग शासन निर्णय क्र. मुंविनि-२०२२/प्र.क्र.२७/२०२२/विनियम, दिनांक १२.०१.२०२३ मधील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून निधी वितरण करण्यात येत आहे.

०९. सदर अनुदान सशर्त असून या पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानाचे प्रमाणपत्र सादर केले आहे. वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

१०. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक २४.०६.२०२१ व दिनांक १४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे/ अटी व शर्तीचे पालन करुन त्यासंदर्भात आवश्यक ते प्रमाणपत्र सादर करणे अथवा आवश्यक त्या बाबी स्वतंत्रपणे प्रमाणित करणे राज्य आरोग्य सोसायटीस अथवा सदरहू निधी ज्या यंत्रणेमार्फत खर्च करण्यात योणार त्या कार्यक्रम प्रमुखास बंधनकारक राहील.

११. सदर प्रस्तावावरील निधीच्या विनियोगाच्या अनुषंगाने आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीच्या संदर्भांत शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार सक्षम प्राधिकारी यांची प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

१२. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२४४/२०२४/व्यय-१३ दिनांक २९/०४/२०२४ व अनौपचारिक संदर्भ क्र.१७/२०२४/ दिनांक ९/०५/२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०५१६११३२४४७२१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA VITTHAL KUDALE

Digitally signed by RAJENDRA VITTHAL KUDALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=b512f7ff8b758d60a4598c24a36386a4805881cbcea84410a43526338ca5896f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=92FCD41179A2BA99BFFA75CBE0C90685A327C8ACC0593DB3D1CCAD3F24BA6315, cn=RAJENDRA VITTHAL KUDALE
Date: 2024.05.24 16:52:55 +05'30'

**( राजेंद्र वि. कुडले )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) अतिरिक्त अभियान संचालक, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान, मुंबई.
३) संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४) संचालक १ व २, आरोग्य सेवा, मुंबई व पुणे.
५) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), मुंबई
६) सर्व सह संचालक (आरोग्य सेवा संचालनालया मार्फत)
७) सर्व सहसचिव/उपसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग.
८) उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे.
९) उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.
१०) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
११) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
१२) निवडनस्ती (आरोग्य-७)